# अवजड सामानाची रवानगी बोटीवरून...!

# भारवाहक २

## अवजड सामानाची रवानगी बोटीवरून...!







**त्याकाळात दमण ते मुंबई पट्टीत पोर्तुगीजांची सत्ता होती, त्याच्याबोटी अशा दिसत...**

*महाराजांच्या आखणी प्रमाणे जे सामान ओलेचिंब झाले, नैसर्गिक आपत्ती येऊन बुडाले किंवा चाच्यांच्या तावडीत सापडून गमवावे लागले तरी चालेल अशा बोजड साधन संपत्तीचे 'लोढणे' जमिनीवरून वाहून नेण्यातील गैरसोई आणि धोके लक्षात घेऊन या भागातील मालवाहू जनावरांना रस्ता बदल करून अशा वाटेने 'दमण' या त्यावेळी पोर्तुगीजांच्या ताब्यातील बंदरात नेऊन तेथून दाभोळच्या खाडीत आतवर आणायचे असा निर्णय घेणे योग्य आहे असे मिलिट्री कमांडरच्या नजरेतून अभ्यास करत असताना लक्षात येते. १६६९ साली महाराजांनी एक करार करून मालवाहतुक करायला जहाजे पैसै भरून दमण ते मुंबई बेटापर्यंतच्या सुमारे २०० किमी पट्टीतील समुद्रात पोर्तुगीजांची परवानगी मिळेल अशी सोय केली होती.*




धरमपुर ते दमण किल्ला मार्ग




बारडोली ते धरमपुर मार्ग

दमण पर्यंतच्या वाटा कशा निवडाव्या ? पूर्णा नदीच्या अरुंद पात्रातून जायला कमी त्रास होईल. वाटेतील रामनगर आणि जव्हार संस्थानाच्या अखत्यारीतील जमिनींचा भाग आहे त्यावरून जावे लागेल. मात्र धनसंपत्तीने लादलेल्या जनावरांकडे पाहून त्यांना ते वाटेतील मिळालेले 'घबाड' असे वाटून लोभाने ते जीव तोडून हल्ला करू शकतात. यासाठी त्यांच्या सेनेच्या केंद्रांना चुकवत चुकवत, अदिवासी भागातील बोली भाषेतील वाटाडे व मालवाहतूकदारांकडून कामे करवून घेतले गेले.

धर्मापूर किंवा धरमपूर पर्यंत त्यांच्या वाटेत कोणाचा धोका उत्पन्न झाला नाही असे मानले तर बारडोली ते धरमपेठ १०० किमी अंतर पार करायला ४ ते ५ दिवस लागले. त्यानंतर दिशा बदलून वापी गावाला पोचल्यावर, तांडे तिथेच थांबवून घोडदळाने पुढे कूच करून दमणच्या जाऊन तेथील परिस्थिती पाहून बंदरात किती जहाजे उभी आहेत, तांड्यांसोबत आणलेल्या मालाला न्यायला किती जहाजे लागतील, त्यातील व्यापारी किती? सैनिक आरमारी किती? याचा शोध घेण्यासाठी महाराजांच्या विश्वासातील सरदार

आनंदराव मकाजी गेले. पोर्तुगीजांनी तसे सहकार्य करावे यासाठी पुर्वीच्या कराराची प्रत दाखवून जहाजे मिळवणे, बंदरावरील धक्क्यावर बोट भरायच्या तंत्राला अवगत तेथील हमालांना कामाला बोलावले गेले. यानंतर जहाजावरच्या कप्तान आणि त्याच्या क्रू म्हणजे अन्य चालक मंडळींना पैसे चारून पुढील प्रवासासाठी धान्य, भाजीपाला वगैरे भरून शिडे सांभाळणारे, दिशा ठरवणारे, वल्ही मारणारे वगैरेची माहिती काढून, पायदळाच्या पथक सैनिकांचे वजन वजा करून किती सामान प्रत्येक जहाजावरून नेता येईल यावर विचार केला.

*(*काही (दहा) जहाजे अशा कामांसाठी वापरली गेली असे त्या वेळच्या पत्रातून सांगितले गेले होते. एका जहाजात किती सामान भरले जाईल यावर जहाजाचा आकडा ठरला. वजनाचा अंदाज बोटीचा लोड मास्टर ठरवत असतो. सोने-चांदीच्या दागदागिन्यांचे, जरीवर्क, लाकडी सामान बनवणारे कारागीर, कलाकुशल पकडून आणलेल्या लोकांना आणि वाटेत चाचांच्या हल्ल्यापासून सामानाच्या रक्षणासाठी जितके मावतील असे कदाचित एक हजार पेक्षा जास्त मराठे सैनिक जहाजात बसू शकतात. जहाजे कुठे जाणार आहेत ते मुद्दाम सांगितले गेले नसावे. कारण काही जहाजे त्यानंतर हा काफिला कुठवर जातो याचा माग काढायला पाठवली गेली होती.)*

ह्या जहाजांची पाठवणी केल्यानंतर सूरतेवरून थेट दमणपर्यंत आलेल्या मालवाहतूकदारांना त्यांचे मालवाहू प्रवास भाडे चुकते करायला आणि वर भरपूर मानधन देऊन परतवले. तोपर्यंत साधारणपणे ८ दिवस झाले. दिनांक २५ ऑक्टोबर नंतर त्या तांड्यांसोबत गेलेल्या घोडदळाने सरदार मोरोपंत पिंगळे यांच्या नेतृत्वाखाली पुन्हा शिवाजी महाराजांच्या सोबतच्या तांड्याला मिळायला मुल्हेरची वाट पकडली.

दमण किल्लातट ते दाभोळच्या खाडी पर्यंतचा सागरी मार्ग...नागावच्या खाडीत माल उतरवला गेला पण पाठलाग करणाऱ्या जहाजांना चकवायला जहाजे दाभोळपर्यंत गेली.

मिसळपाव.कॉम २०४४ वाचने

हा विचारच केला नव्हता कधी

1 Feb 2019 - 1:33 pm | *विजुभाऊ*

हा विचारच केला नव्हता कधी

- प्रतिसाद द्या



जबरदस्त लेखमाला.

1 Feb 2019 - 6:24 pm | *चित्रगुप्त*

जबरदस्त लेखमाला. छत्रपतींच्या जीवनातल्या किंवा इतर ऐतिहासिक-पौराणिक घटनांबद्दल त्याकाळी प्रत्यक्षात कसे काय घडले असावे याबद्दलचे संशोधन आणि लिखाण व्हायला हवे. हा विषय हाती घेतल्याबद्दल अभिनंदन, आभार आणि शुभेच्छा.

- प्रतिसाद द्या



खुपच अभ्यासपुर्ण लिखाण. वाचत
2 Feb 2019 - 7:46 pm | *दुर्गविहारी*

खुपच अभ्यासपुर्ण लिखाण. वाचत आहे. काही संदर्भ सापडले तर नक्कीच प्रतिसादात देईन.

- प्रतिसाद द्या



जव्हार वरून महाराज का आले नसावेत?
15 Feb 2019 - 4:00 pm | *शशिकांत ओक*

सातमाळाचा घाट व डोंगराळ चढाचा लांबचा मार्ग निवडण्यामागे महाराजांचे काय नियोजन असेल?
विचार वाचायला आवडतील

.... भाग ४ पुढे चालू....

# मुल्हेरच्या वाटेवर... मुगलांच्या प्रदेशात प्रवेश...




## वसांडा पर्यंतचा सपाट रस्ता संपल्यावर अहवा पर्यंतचा डोंगराळ चढाचा रस्ता

बारडोली मागे पडून गेल्यावर तो हजारो जनावरांवरून संपत्ती मुल्हेरकडे घेऊन चाललेला तांडा गावांना वळसा देत शक्यतो सामोरे न जाता वांकानेर, शिकेर, वलोड, बुहारी, डोलावण पार करून उनई पाशी नदी आली. हळूहळू चढ लागला. जनावरांचा वेग मंदावला.

मालवाहकांसमावेतील महाराजांच्या सैनिकांची दक्षता पथके मिळवलेल्या संपत्तीच्या रक्षणासाठी डोळयात तेल घालून पहारा करत होती. सोबत असे अनेक लोक कामांच्या बहाण्याने ज्या मालवाहू जनावरांच्या जवळ सोने-चांदीच्या, हिरेमोत्यांच्या जाडजूड चामड्याच्या बॅगा, रोकड थैल्या, रेंगाळत होते. उदाहरणार्थ मशालची, दुभाशे, आसपास भागात जाऊन जनावरांना चारा व सैनिकांसाठी भोजन-पाण्याची सोय करणारे-भिस्ती, याशिवाय बाणांचे गठ्ठे, शस्त्रे दुरुस्ती आणि पात्यांना धार करणारे, संदेशांना विविध तऱ्हेने वाजवून तुतारी-शंख फुंकणारे, ऐनवेळी पकडून आणलेले हमाल, जनावरांचे पाठीवरून माल वाहतूक करणारे लमाणी  दरिद्री, खडतर जीवनयापन करताना येण्या-जाण्याच्या

सरावाच्या रस्त्यातील धोके, लपवायच्या जागांची खडानखडा माहिती असलेल्या लबाडांच्याशी लाडीगोडी लाऊन काही ठरत असेल तर आपल्याला माहित नाही असे नको म्हणून सलगी करून होते, हल्लाबोल करताना जखमी, भाजलेले सैनिक ज्यांना घरापर्यंत सुखरूप जाऊ अशी खात्री नव्हती असे, तर काही कावेबाज, संधीसाधू सैनिक आणि सगळांना आपल्या बरोबर काय काय प्रचंड घन भरलेले आहे याची जाणीव असलेले होते. अत्यंत गबर श्रीमंतांच्या घरातील कधी न पहायला मिळणारे वैभव घेऊन चाललोय याची मनोमन खात्री होती. थोडाही हात मारायची संधी असेल तर कशी साधावी अशी मनोरथे सगळे रंगवत होते.

याच्या विपरीत महाराजांच्या सोबतच्या निश्चयात्मक सरदार आणि महाराजांच्या कार्यातील उदात्तता मान्य होती अशा हजारोंच्या मावळे सैनिकांच्या खांद्यावर विश्वासाने हात टाकून महाराज असल्याने ही संपत्ती घरपोच होईल याची खात्री होती.

घोडेस्वार डोक्यावर फेटा, पांढऱ्या रंगाचा अंगरखा, कमरबंद, काचा मारलेले धोतर किंवा विजार, कमरेला तलवार व खंजीर, खांद्यावर ढाल, खोगिरापाशी धनुष्यबाण असे मराठे सज्ज असत. खुद्द महाराज बरोबरच्या मालवाहकांसमावेतील लोकांशी ते कुठले, कसे आहात वगैरे आपुलकीने बोलून आपलेसे करत. आपल्या सैनिकांना ते करत असलेल्या जोखमीच्या कामातील गांभीर्य समजावून सांगत असत. ते परततील तेंव्हा त्यांना भरपूर मेहनताना दिला जाईल याची जाणीव मुद्दाम करून देत असत.



**अहवा ते चिंचणी. नंतर जास्त चढाचा अजांदे पर्यंत मार्ग... नंतर घाटातील वळणे घेत जाणारा मुल्हेर किल्ल्याच्या पायथ्याशीचा मार्ग**

हळूहळू जात जात जत्था अशा टप्प्यात आला जिथून जंगलातील चिंचणी गावठापाशी वळसेदार चिंचोळया वाटेत विश्रांतीला जनावरांच्या अंगावरून उतरवून ठेवणे अवघड होऊ लागले असेल. नदी ओलांडायला सकाळी जायचे ठरल्यावर रात्रीच्या काळोखात जनावरांच्या अंगावरील पडशा रात्रीच्या विश्रांतीसाठी काढून ठेवल्यावर काहींनी आपल्या हुशारीने काही गाढवांवर लादलेल्या बोचक्यातील 'सामान' पटापट काढून त्या ऐवजी वजनदार दगड माती भरून ठेवली. ती बोचकी झाडे व नदीच्यापात्राची खूण धरून पुरायसाठी काहींनी तत्परता दाखवून आम्ही तुम्हाला हे काम करताना पाहिले असल्याचे सांगून गुपचुप आपला वाटा त्यात असल्याचे मानायाला लावले. त्या २-३ किमी पेक्षा लांब लटांबरात जंगलाच्या वाटेतील अनेक वळणावर रातोरात असे हातचलाखीचे प्रयोग चालू होते. जे काम करायचे त्यासाठी हीच संधी असे मानून रात्री पडल्या पडल्या हातात पैसै पडले की परतताना या वाटेवरच्या खुणेने पुरलेल्या घबाडाने आपले उर्वरित जीवन जगायला घरी परत न जाता कुठेतरी पसार होणे ठीक होईल असे मनसुबे रचले जात होते.

पहाटे उठून रस्त्यावर आल्यावर अनेक वाहकांना धरून पिटाई करून उंचीवरून नदीत ढकलून अंत होताना पाहून आपल्यावर पाळत ठेवली जात होती याचा खुलासा झाला. सैनिकांना आपण रात्रीत काय प्रकार केला आहे ते कळले. कालचा लपवलेला माल खोदून पुन्हा भरायला लागलेले दृष्य अनेक ठिकाणी दिसायला लागले. सर्व पुन्हा सुरळीत झाल्यावर तांडा सरकत जाताना भावंदागढ गेले.



**बारदा धबधबा**

बारदा धबधब्याच्या पाण्यात थंडावा घेऊन अहवा गावात पोहोचायला रात्र झाली। नंतरच्या सकाळी म्हणजे सूरत ६ ऑक्टोबरला सोडल्यावर १२ तारखेला खरा चढ लागला। चिंचलीपासून खडा चढ चढताना जनावरे घामाघूम झाली। महाराजांना तोवर बातमी लागली की मुल्हेरच्या पायथ्यापाशी असलेल्या बाजारपेठेत धुमाकुळ घातला तरी साल्हेरच्या किल्ल्यावरून सैन्य जमवून घेऊन यायच्या आत आपल्याला बराच माल हस्तगत करता येईल।

१२ ऑक्टोबर तारखेला सुरतहून आलेल्या मालवाहू थकलेल्या जनावरांची बदली मुल्हेरच्या बाजारात होणे ठरलेले होते. त्या प्रमाणे महाराजांच्या आघाडीच्या पलटनीने आधी जाऊन जनावरांच्या मुल्हेरात मालवाहक मालकांशी व कंत्राटदारांच्या मध्यस्थीने शेकडो जनावरांची, बैलगाड्यांची सोय करायला सुरवात केली. सुरतहून आलेले गुजराती भाषी सगळे मालवाहक आपल्याला मिळालेल्या सढळ बिदागीवर खूष होऊन सलाम करून आपापली जनावरे हुर्.…र हुश्श… करत परतले.

मुल्हेर किल्याच्या पायथ्याजवळ अंतापूर तळ येथून बैलगाड्यांनी पार आग्र्याला जायला-यायला, हजयात्रेला सूरतला जाण्यासाठी, व्यापारी लोकांच्या आरामदायक प्रवासाची सोय पूर्वापार चालत आली असल्याने गाढवांसारखी खडी जनावरे व योग्य बैलगाड्यांचा बंदोबस्त करून सामानाची अदला बदल करायचे काम करवून घेत दोन दिवसांची विश्रांती झाली. दहा हजार घोडदळ, हजारांपेक्षा जास्त पायदळ घेऊन 'सिवा' आपल्या किल्ल्यावर केंव्हाही चाल करून येऊ शकतो. म्हणून मुल्हेर किल्लेदाराने लपून बसणे शहाणपणाचे ठरेल असा विचार करून तो रक्षणाची जबाबदारी टाळून बसलेला समजताच महाराजांनी मुल्हेरच्या बाजारपेठेत पुकारा करून बऱ्याबोलाने आपल्याकडील संपत्तीचा भरणा करावा आणि माझ्या राज्याची चौथाई मान्य करून यापुढे माझ्यातर्फे पाठवलेल्या वसूली कारभाऱ्यांना कर भरणा करावा. नाहीतर आपण काहीही करू शकतो हा धाक निर्माण करायला त्यांनी काहींना शारीरिक इजा करून घबराट उडवून दिली. अनेकांनी मागितलेली रक्कम देऊन जीव वाचवला. व्यापारी वर्गावर वचक ठेऊन असावे पण त्यांना व्यापार करायला भय वाटून त्यांची हिम्मत कचरेल असे करणे चुकीचे ठरेल, असा विचार करून महाराजांनी आधीच्या मालात भर टाकून नव्या दमाच्या जनावरांसह नेकनाम खानाला साल्हेर किल्ल्यातून मुल्हेरला यायच्या भानगडीत पडायच्या आत निघणे पसंत केले.




सिवा सुरतला जाण्याची व लुटून कल्याण-भिवंडी मार्गाने परत जाण्याची शक्यता धरून अनेक महिने मुगल सेनानी सिवा येण्याची बातमी ऐकून होते. पण तो सुरतेहून कोकणातून परत न जाता अहवाच्या आदिवासी जंगली भागातून बिकट घाट चढून मुल्हेरच्या किल्लावर घात लावून सातबारीच्या भागातून नाशिक मार्गे सटकला आहे. ही बातमी ताबडतोबीने दक्षिणेचा सुभेदार औरंगजेबाचा मुलगा मुज्जमला औरंगाबादेला पोचली. त्यातल्यात्यात जवळचे सैनिकी ठाणे होते बऱ्हाणपुरला. मुगल सैन्याला आपल्याला अडवायचे असेल तर दुरून यावे लागेल तोवर आपण सातबारीच्या डोंगरातून वाट काढत वणीघाट मागे टाकून संगमनेरकडे कसे जाता येईल याचा विचार करून होते. शक्यता की मुगलांचे आसपासच्या जागिरदारांच्या सैन्याचे वेगवेगळया सरदारांचे संचलन आपल्याला वाटेत गाठेल. पर्याय असे होते की असलेल्या प्रचंड मालमत्तेला घेऊन पुढे जावे? का मागे ठेऊन लढून परत येऊन मग कूच करावे? किंवा तांड्याचे विभाग पाडून वेगवेगळया मार्गाने जायला पाठवावे? तसे केले तर नंतर भेटावे कुठे? काही कारणांनी तशी भेट झाली नाही तर हा माल कुठल्यातरी किल्ल्यावर बंदोबस्तात ठेवायला हवा आणि मग राजकारणाची हवा कशी वाहते याचा अंदाज घेऊन मग पुढची आखणी करावी. असे अनेक पर्याय त्यांनी

**विचारात घेतले. आपल्या सहकाऱ्यांचा सल्ला काय पडतो? सेनेला धोक्यात घालावे किंवा नाही यावर विचार विनिमय करून पुढची चाल महाराजांनी काय ठरवली असेल?**

मिसळपाव.कॉम १८७४ वाचने

अनेकांची मनोरथे

21 Feb 2019 - 3:53 pm | *करमरकर नंदा*

संपत्तीची हाव कोणाला नाही? जंगलातील रात्र, पकडले गेलो तरी बेहत्तर पण डल्ला मारायची ही संधी घ्यायलाच हवी असे साहसी कृत्य जीव गमवायला कारणीभूत होते याचे विदारक सत्य वाचून अंगावर शहारे आले.

**भाग 5 पुढे चालू...**